20110317174226001

कल्याण डोंबिवली महानगरपालिकेच्या स्थायी समितीवर नामनिर्देशनाने सदस्य नियुक्तीचा दि.२४/१२/२०१० चा ठराव क्र.९९ अंतिमतः विखंडीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
**शासन निर्णय, क्र. कडोम -१०११/०३/प्र.क्र.८७/२०११/नवि-२८**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : ११ मार्च, २०११.**

**संदर्भ क्र.** (१) कल्याण - डोंबिवली महानगरपालिकेचा ठराव क्र.९९, दि.२४.१२.२०१०.
(२) श्री. सचिन पोटे, गटनेता व इतर कल्याण -डोंबिवली महानगरपालिका यांचे दि.२४.१२.२०१० चे पत्र.
(३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन यांचे पत्र क्र.साशा/का-३/नपा- २/वशी-३/ २०११, दि. ०४.०१.२०११.
(४) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे दि.०४.०१.२०११ चे पत्र.
(५) नगर विकास विभाग समक्रमांक दि.०६.०१.२०११ चा शासन निर्णय.
(६) महापौर, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे दि.०५.०२.११ चे अभिवेदन.
(७) गटनेता, भारतीय जनता पार्टी यांचे दि. १४.०२.२०११ चे अभिवेदन.

**प्रस्तावना :-**

श्री.सचिन पोटे, गटनेता, कॉंग्रेस (आय) व श्री.गणेश कोट, गटनेता, राष्ट्रवादी कॉंग्रेस व श्री.हरिचंद्र हरदास, गटनेता (अपक्ष) यांनी शासनास उद्देशून लिहिलेल्या संदर्भाधीन दि.२४/१२/२०१० च्या निवेदनान्वये कल्याण-डोंबिवली महानगरपालिका ठराव क्र.९९ दि.२४.१२.२०१० अन्वये स्थायी समितीवर १६ सदस्यांची नामनिर्देशनाव्दारे नियुक्ती करतांना मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ कलम ३१-अ चे उल्लघन केले असून नामनिर्देशनाने सदस्यांची नियुक्ती करतांना कल्याण-डोंबिवली संयुक्त आघाडीचे तौलनिक संख्याबळ लक्षात न घेता, १६ सदस्यांची स्थायी समितीवर नामनिर्देशनाव्दारे नियुक्ती केली आहे. यात कल्याण-डोंबिवली संयुक्त आघाडीवर अन्याय झाला असल्याने दि.२४/१२/२०१० चा ठराव क्र.९९ रद्द करण्याबाबत विनंती केली होती.

०२. श्री.सचिन पोटे व इतर यांनी केलेल्या निवेदनास अनुसरुन विभागीय आयुक्त, कोकण विभाग आणि आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्र क्र. २ व ३ अन्वये शासनास सादर केलेल्या अहवालानुसार कॉंग्रेस, राष्ट्रवादी कॉंग्रेस व ३ अपक्ष यांची कल्याण-डोंबिवली संयुक्त आघाडीचे सभागृहातील संख्याबळ ३२ असून स्थायी समितीच्या नामनिर्देशीत करावयाच्या १६ सदस्यापैकी पक्षीय बलाबलानुसार ५ सदस्यांचे नामनिर्देशन करणे आवश्यक आहे. तथापि, कल्याण-डोंबिवली संयुक्त आघाडीचे तौलोनिक संख्याबळ लक्षात न घेता, भारतीय राष्ट्रीय कॉंग्रस २ आणि राष्ट्रवादी कॉंग्रेस २ अशा फक्त ४ सदस्यांना स्थायी समितीवर नामनिर्देशित केले आहे. सदर बाब मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या तरतूदीशी विसंगत असल्याचे विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांनी कळविले आहे.

०३. आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका व विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांनी सादर केलेला अहवाल, प्रस्तुत ठरावाच्या अनुषंगाने मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ३१अ(२) मधील तरतूद पहाता, महानगरपालिकेच्या या ठरावाची अंमलबजावणी झाल्यास स्थायी समिती सभापती निवडीवर त्याचा परिणाम होवु शकतो. ही बाब लक्षात घेऊन, महानगरपालिकेच्या सदर निर्णयाची अंमलबजावणी तात्काळ थांबविणे क्रमप्राप्त होते. त्यामुळे मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ अन्वये राज्य शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करुन कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेचा दि.२४/१२/२०१० चा ठराव क्र.९९ शासनाने दि.०६/०१/२०११ रोजी निलंबित केला होता. यावर संबंधीतांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास ३० दिवसाच्या आत शासनास सादर करण्याबाबत कळविले होते. त्यानुसार महापौर, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका व गटनेता, भारतीय जनता पार्टी यांनी अनुक्रमे दि.०५/०२/२०११ व दि.१४/०२/२०११ रोजी शासनाने निलंबित केलेल्या सदर ठरावाच्या अनुषंगाने शासनाकडे अभिवेदन सादर केली आहेत. सदर अभिवेदनात प्रामुख्याने खालील मुद्दे उपस्थित केलेले आहेत.-

१) भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस, राष्ट्रवादी कॉंग्रेस व अपक्ष यांनी केलेली कल्याण-डोंबिवली संयुक्त आघाडी रितसर नाही. एका महिन्यात दोनदा नोंदणी केलेली आहे.

२) कल्याण-डोंबिवली संयुक्त आघाडी स्थापन करताना नेता निवडलेला नाही.

३) पक्षाच्या किंवा गटाच्या वतीने नामनिर्देशित करावयाच्या पालिका सदस्यांच्या संख्येच्या बाबतीत मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३१(३) नुसार कोणताही वाद उद्‌भवल्यास महानगरपालिकेचा निर्णय अंतिम आहे.

४) मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ खाली महानगरपालिकेने केलेला ठराव क्र.९९ निलंबित करण्याचा शासनास अधिकार नाही.

५) उपरोक्त प्रमाणे दाखल केलेले अभिवेदन लक्षात घेऊन दि.२४/१२/२०१० चा ठराव क्र.९९ चे निलंबन रद्द करावे व विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांन स्थायी समिती सभापती पदाची स्थगित केलेली निवडणूक घेण्यास आदेशित करावे.

०४. दरम्यानच्या काळात श्री.जनार्दन पुरुषोत्तम म्हात्रे व इतर यांनी दि.१६/०१/२०११ रोजी मा.उच्च न्यायालयात रिट याचिका क्र.२६७/२०११ दाखल केली. सदर याचिकेबाबत दि.०४/०३/२०११ रोजी मा.उच्च न्यायालयाने निर्णय दिला आहे की,

"या प्रकरणाची कालमर्यादा विचारात घेता, राज्य शासनाने दि.११/०३/२०११ पूर्वी निर्णय घ्यावा. निर्णय घेताना सदर प्रकरणातील वादी यांचे अभिवेदन विचारात घेण्यात यावे. तसेच महानगरपालिकेकडून कलम ३१(अ) खाली घेतलेल्या निर्णयाचे पुर्ननिरिक्षण राज्य शासन मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ खाली करु शकते काय, हे ही पहावे."

०५. महापौर, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका व गटनेता, भारतीय जनता पार्टी यांनी सादर केलेल्या अभिवेदनावर शासनाने विचार केला असून खालीलप्रमाणे मत झाले आहे.-

१) मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ३१अ(२) मधील तरतुदीनुसार मान्यताप्राप्त/नोंदणीकृत पक्ष तसेच मान्यताप्राप्त गट यांनी निवडणूकीचा

निकाल अधिसूचीत झाल्यापासून एक महिन्याच्या मुदतीत आघाडी/गट स्थापन करणे अनुज्ञेय आहे. त्यामुळे काँग्रेस व राष्ट्रवादी काँग्रेस मान्यताप्राप्त पक्ष तसेच ३ अपक्षांच्या नोंदणीकृत गटाने विहित एक महिन्याच्या मुदतीत दि.२२/११/२०१० पूर्वी "कल्याण-डोंबिवली संयुक्त आघाडी" स्थापन करण्याची कृती कलम ३१अ च्या तरतूदीशी विसंगत नाही. विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांनी देखील सदर आघाडीची नोंद घेतलेली आहे. तसेच एक महिन्याच्या मुदतीत दुसऱ्यांदा आघाडी करण्यासही अधिनियमातील कलम ३१अ मध्ये प्रतिबंध नाही.

२) प्रस्तुत प्रकरणी पक्षीय बळाच्या आधारे स्थायी समितीवर सदस्य नामनिर्देशित करण्याची कार्यवाही ही "निवडणूक" या व्याख्येत मोडत नाही. सदर कार्यवाही मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३१ अ च्या तरतूदीनुसार न केल्यास ती "बेकायदेशीर" व्याख्येत मोडते व परिणामी शासनास अशा प्रसंगी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१(१) व (३) खाली सदर बेकायदेशीर निर्णय निलंबित/विखंडित करता येतो.

३) मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ अन्वये महानगरपालिकेने केलेला कोणताही ठराव किंवा आदेश केल्याने किंवा महानगरपालिकेकडून कोणतीही गोष्ट केली जाण्याची शक्यता आहे. ती केल्याने हा अधिनियम किंवा त्यावेळी अंमलात आलेला इतर कोणताही कायदा अधिकाराच्या विरुद्ध किंवा मर्यादेबाहेर, शांततेचा भंग करणारा, लोकांच्या किंवा व्यक्तीच्या गटास/वर्गास इजा त्रास होण्याचा संभव आहे व तो लोकहिताविरुद्ध असल्याचे शासनाचे मत झाल्यास असा ठराव शासनास निलंबित/विखंडीत करता येतो. अशावेळी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३१अ(३) ची तरतुद शासनाच्या आड येत नाही.

आघाडीचा नेता नाही म्हणजे त्यांना Proportionate (प्रमाणशील) सदस्यत्व मिळणार नाही, असे नाही.

वरील मुद्दे विचारात घेऊन कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेचा दि. २४/१२/२०१० चा ठराव क्र. ९९ विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

विभागीय आयुक्त, कोकण विभाग व आयुक्त कल्याण - डोंबिवली महानगरपालिका यांचे संदर्भाधिन अहवालावरुन कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेचा दि.२४/१२/२०१० महासभा ठराव क्र. ९९ हा मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३१ अ (२) मधील तरतुदीशी विसंगत असल्याने महापालिकेच्या सदर निर्णयाची अंमलबजावणी तात्काळ थांबविणे क्रमप्राप्त झाल्याने शासनाने महापालिकेचा ठराव दि. ०६/०१/२०११ च्या शासन निर्णयान्वये निलंबित केलेला आहे. सदर ठराव, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५१ (३) अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकाराचा वापर करुन अंतिमतः विखंडित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्रभाकर पवार )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.सचिव-२ ,नगर विकास विभाग यांचे स्टाफ ऑफिसर, मंत्रालय,मुंबई-३२
३) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका , कल्याण जिल्हा-ठाणे.
४) महागरपालिका सचिव, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका , कल्याण जिल्हा-ठाणे.
५) विभागीय आयुक्त कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
६) कक्ष अधिकारी, संगणक विभाग, नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती , नवि-२८.
८) उपसचिव, विधी व न्याय विभाग.